केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण व राज्य पुरस्कृत विविध आवास योजनांमध्ये गतिमानता व गुणवत्ता वाढीसाठी राज्यात **-महा आवास अभियान - ग्रामीण २०२१-२२॰** राबविणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**ग्राम विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः प्रआयो-२०२१/प्र.क्र.९७/योजना-१०**

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,

फोर्ट, मुंबई-४०० ००१

तारीखः १६ नोव्हेंबर, २०२१

वाचा -

१) ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः पीएमएवाय-जी-२०१६/प्र.क्र. ३३३/योजना-१०, दिनांक १४ ऑक्टोबर, २०१६.
२) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांकः बीसीएच-२०११/प्र.क्र. १२६/मावक-२, दिनांक १९ नोव्हेंबर, २०११.
३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः घरकुल-२०१२/प्र.क्र. ३८(भाग-१)/का-१७, दिनांक २८ मार्च, २०१३.
४) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः आदिम-२०१५/प्र.क्र. ८९/का-१९, दिनांक ३१ मार्च, २०१६.
५) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः घरकुल-२०१६/प्र.क्र. ३७/का-१७, दिनांक २७ मे, २०१६.
६) ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः प्रआयो-२०१७/प्र.क्र. ६०/योजना-१०, दिनांक १४ जुलै, २०१७.
७) विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, शासन निर्णय क्रमांकः गृनियो-२०१७/प्र.क्र. ६०/विजाभज-१, दिनांक २४ जानेवारी, २०१८.
८) ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः प्रआयो-२०१७/प्र.क्र. ३४८/योजना-१०, दिनांक १६ फेब्रुवारी, २०१८.
९) उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांकः इबांका २०१८/प्र.क्र. २०८/कामगार-७, दिनांक १४ जानेवारी, २०१९.
१०) ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः प्रआयो-२०२०/प्र.क्र. १०७/योजना-१०, दिनांक १९ नोव्हेंबर, २०२०
११) ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः प्रआयो-२०२०/प्र.क्र.१०७/योजना-१०, दिनांक २५ फेब्रुवारी, २०२१.
१२) ग्राम विकास विभाग शासन निर्णय क्रमांकः प्रआयो-२०२०/प्र.क्र.१०७/योजना-१०, दिनांक ३१ मार्च, २०२१.

१३) ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः प्रआयो-२०२०/प्र.क्र.१०७/योजना-१०, दिनांक ०३ मे, २०२१.

१४) ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः प्रआयो-२०२०/प्र.क्र.१०७/योजना-१०, दिनांक १०,जून २०२१

**प्रस्तावना -**

"सर्वांसाठी घरे-२०२२" हे केंद्र शासनाचे महत्वाचे धोरण असून राज्य शासनाने देखील या धोरणाचा स्विकार केला आहे. या अनुषंगाने राज्यात राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण कार्यालयाच्या माध्यमातून केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण तसेच राज्य पुरस्कृत रमाई आवास योजना, शबरी आवास योजना, पारधी आवास योजना, आदिम आवास योजना, अटल बांधकाम कामगार आवास योजना, यशवंतराव चव्हाण मुक्त वसाहत योजना अशा विविध ग्रामीण गृहनिर्माण योजना राबविण्यात येत असून त्यांना पूरक पंडीत दीनदयाळ उपाध्याय घरकुल जागा खरेदी अर्थसहाय्य योजना, अतिक्रमण नियमानुकूल करण्याची योजना अशा योजनाही राबविण्यात येत आहेत.

संयुक्त राष्ट्रांच्या शाश्वत विकास ध्येये (Sustainable Development Goals) मधील ध्येय क्रमांक ११ नुसार किफायतशीर गृहनिर्माण (Affordable Housing) क्षेत्रात काम झाल्यास एकूण १७ SDG पैकी किमान १४ SDG वर सकारात्मक प्रभाव पडणार आहे. यासाठी घरकुलांच्या कामाची प्रगती फक्त संख्यात्मक न राहता गुणात्मक राहावी, नावीन्यपूर्ण कल्पना अंमलात आणून लाभार्थ्यांना सर्व सुविधायुक्त असे घरकुल उपलब्ध करुन द्यावे, तसेच नैसर्गिक आपत्तीस सक्षमपणे सामोरे जाणारे घरकुल बांधण्यासाठी सर्वांनी पुढाकार घ्यावा असे शासनाचे ध्येय आहे.

प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण ही योजना देशात दिनांक २० नोंव्हेंबर, २०१६ पासून अंमलात आली असून दरवर्षी २० नोव्हेंबर हा "राष्ट्रीय आवास दिन" म्हणून राबविण्यात येतो. गत वर्षी प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण अंतर्गत आवास दिनाचे औचित्य साधून राज्यात सर्व ग्रामीण गृहनिर्माण योजना अधिक गतिमान करण्यासाठी व गुणवत्तावाढीसाठी उपरोक्त संदर्भ क्रमांक १० अन्वये दिनांक २० नोव्हेंबर, २०२० पासून "महा आवास अभियान-ग्रामीण" राबविण्यास मान्यता देण्यात आली होती. उपरोक्त संदर्भ क्रमांक ११, १२ व १३ अन्वये या अभियान राबविण्यास दिनांक ०५ जून २०२१ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

दिनांक २० नोव्हेंबर २०२० ते ०५ जून २०२१ या कालावधीत राबविण्यात आलेल्या महा आवास अभियान-ग्रामीणमुळे विविध ग्रामीण गृहनिर्माण योजनांच्या अंमलबजावणीमध्ये आलेली गतीमानता व गुणवत्तावाढ विचारात घेता सन २०२१-२२ या वर्षामध्ये "महा आवास अभियान २०२१-२२" राबविण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय-

सन २०२१-२२ या वर्षामध्ये महाराष्ट्र राज्यात दिनांक २० नोव्हेंबर, २०२१ रोजीच्या राष्ट्रीय आवास दिनाचे औचित्य साधून केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण व राज्य पुरस्कृत रमाई आवास योजना, शबरी आवास योजना, पारधी आवास योजना, आदिम आवास योजना, अटल बांधकाम कामगार आवास योजना, यशवंतराव चव्हाण मुक्त वसाहत योजना या सर्व ग्रामीण गृहनिर्माण योजनांच्या अंमलबजावणी मध्ये गतिमानता व गुणवत्ता वाढीसाठी दिनांक २० नोव्हेंबर २०२१ ते ३१ मार्च, २०२२ या कालावधीत -महा आवास अभियान-ग्रामीण २०२१-२२॰ राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. **"महा आवास अभियान-ग्रामीण २०२१-२२" राबविण्याचे उदिष्टे:-**

i. राज्यात ग्रामीण गृहनिर्माण योजनांची प्रभावी अंमलबजावणी करण्याच्या कामास गतिमान करणे.

ii. ग्रामीण गृहनिर्माण योजनांमध्ये शासकीय यंत्रणा व पंचायतराज संस्था यांचेबरोबरच समाजातील सर्व घटक जसे- स्वयंसेवी संस्था (लायन्स क्लब, रोटरी क्लब, इ.), सहकारी संस्था (साखर कारखाने, दुधसंघ, इ.), खासगी संस्था (Corporates), तंत्र शिक्षण संस्था (IITB, COEP, VNIT, इ.), बँका, लोकप्रतिनिधी, लाभार्थी, ग्रामस्थ, इ. भागधारकांचा सक्रीय सहभाग वाढविणे.

iii. ग्रामीण गृहनिर्माण क्षेत्रामध्ये नावीन्यपूर्ण उपक्रम राबवून घरांची गुणवत्ता वाढविणे.

iv. ग्रामीण गृहनिर्माण योजनांमधील लाभार्थ्यांचे जीवनमान उंचावण्यासाठी शासनाच्या विविध योजनांचा कृतिसंगम (Convergence) घडवून आणणे.

v. राज्यात ग्रामीण गृहनिर्माण क्षेत्रातील भागधारकांची क्षमताबांधणी व जन-जागृतीद्वारे लोक चळवळ उभी करणे.

३. **"महा आवास अभियान- ग्रामीण २०२१-२२" कालावधीत राबवावयाचे उपक्रम :-**

i. **भूमीहीन लाभार्थ्यांना जागा उपलब्ध करुन देणे:-** ग्रामीण गृहनिर्माण योजनांतर्गत गरजू, पात्र परंतु घरकुल बांधकामासाठी जागा उपलब्ध नसलेल्या लाभार्थ्यांना पुढीलप्रमाणे उपाययोजना करुन जागा उपलब्ध करुन देणे.

अ) **पंडीत दीनदयाळ उपाध्याय घरकुल जागा खरेदी अर्थसहाय्य योजना**, शासकीय जागा विनामूल्य उपलब्ध करण्याची योजना, ग्रामीण भागातील अतिक्रमणे नियमानुकूल करण्याची योजना व इतर मार्ग - उदा. बक्षीसपत्र, भाडेपट्टा, इ. प्रभावीपणे राबविणे.

ब) कमी जागेत जास्त लाभार्थी सामावण्यासाठी राज्यात प्रत्येक जिल्हा परिषद गटामध्ये किमान एक याप्रमाणे **बहुमजली इमारती व गृहसंकुले** उभारणे.

ii. **घरकुलांना उद्दिष्टांप्रमाणे १०० टक्के मंजूरी देणे:-** केंद्र पुरस्कृत व राज्य पुरस्कृत योजनांतर्गत सन २०१६-१७ ते २०२१-२२ पर्यंत जिल्ह्यांना वितरीत करण्यात आलेल्या घरकुल उद्दिष्टांना १०० टक्के मंजूरी देण्याकरीता पुढील प्रमाणे उपाययोजना करणे.

अ) घरकुल लाभार्थ्यांची नोंदणी (Registration), Geo tagging, Account Verification, इ. प्रक्रिया **किमान कालावधीत पूर्ण करुन मंजूरी देणे**.

ब) लाभार्थ्यांना घरकुल मंजूरीचे पत्र त्वरीत वितरीत करणे, घरकुलाचे काम तात्काळ सुरु करणेबाबत सूचना देणे, घरकुल बांधकामाबाबत तांत्रिक मार्गदर्शन करणे व भूमिपूजन कार्यक्रम करुन **घरकुलाचे बांधकाम सुरु करणे**.

iii. **मंजूर घरकुलांना पहिल्या हप्त्याचे १०० टक्के वितरण करणे:-** केंद्र पुरस्कृत व राज्य पुरस्कृत योजनांतर्गत सन २०१६-१७ ते २०२१-२२ मधील मंजूर घरकुलांना पहिल्या हप्त्याचे १०० टक्के वितरण विनाविलंब करण्याकरीता पुढील उपाययोजना करणे.

अ) **घरकुलास मंजूरी दिलेल्या लाभार्थ्यांना ७ दिवसाच्या आत पहिल्या हप्त्याचे वितरण करणे व** स्थानिक स्तरावर पहिला हप्ता वितरण कार्यक्रमाचे आयोजन करणे.

ब) पहिला हप्ता वितरण झाल्याबरोबर तात्काळ मनरेगा मस्टर जनरेट करणेबाबतची कार्यवाही करणे.

iv. **सर्व मंजूर घरकुले भौतिक व आर्थिक दृष्ट्या पूर्ण करणे:-** केंद्र पुरस्कृत व राज्य पुरस्कृत योजनांतर्गत सन २०१६-१७ ते २०२१-२२ मधील सर्व मंजूर घरकुलांचे काम भौतिक व आर्थिक दृष्ट्या पूर्ण करण्यासाठी पुढील उपाययोजना करणे.

अ) राज्यात महिला स्वयंसहायता गट/ग्राम संघ/प्रभाग संघ/विविध कार्यकारी सेवा सहकारी संस्था/शेतकरी उत्पादक कंपनी, इ. समुदाय आधारीत संस्थाद्वारे प्रत्येक जिल्हा परिषद गटामध्ये किमान एक घरकुल मार्ट सुरु करुन त्याद्वारे घरकुलाचे बांधकाम साहित्य जसे - दगड, विटा, वाळू, सिमेंट, दारे, खिडक्या, छताचे साहित्य, इ. उपलब्ध करणे, किमान कालावधीमध्ये घरकुले भौतिकदृष्टया पूर्ण करण्यासाठी सरपंच, ग्रामसेवक/ग्राम विकास अधिकारी, ग्रामीण गृहनिर्माण अभियंता यांनी घरकुलांना वेळोवळी भेटी देणे, आवास ॲपद्वारे घरकुल बांधकामाचे टप्पानिहाय फोटो अपलोड करणे, मनरेगा मस्टर जनरेट करणे व मंजूर केलेली सर्व घरकुले १०० ते १२० दिवसात पूर्ण करणे.

ब) सर्व घरकुले आर्थिकदृष्ट्या पूर्ण करण्यासाठी लाभार्थ्यांना घरकुल बांधकामाच्या भौतिक प्रगतीनुसार टप्पानिहाय सर्व हप्ते किमान कालावधीत वितरीत करणे. तसेच गरजे प्रमाणे इच्छूक लाभार्थ्यांना वित्तीय संस्थांकडून गृहकर्ज मिळवूण देणे.

v. **प्रलंबित घरकुले** (Delayed Houses) **पूर्ण करणे:-** प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण अंतर्गत घरकुलांना पहिला हप्ता प्रदान केल्यापासून १२ महिन्यापेक्षा जास्त कालावधी झालेली, मात्र अद्यापपर्यंत अपूर्ण असलेली प्रलंबित घरकुले (Delayed Houses) प्राधान्याने पूर्ण करण्यासाठी पुढील उपाययोजना करणे.

अ) प्रलंबित घरकुलांच्या यादीनुसार घरकुले प्रलंबित राहण्यामागची कारणे शोधून त्या कारणांचे विश्लेषण करुन त्यावर उपाययोजना करणे व प्राधान्याने सदर घरकुले पूर्ण करणे, याकामी गरजेप्रमाणे तालुका कायदेविषयक सहाय्य व सल्ला समितीच्या सहाय्याने "**लोक अदालत**" द्वारे लाभार्थ्यांना घरकुल पूर्ण करण्यासाठी प्रवृत्त करणे.

ब) पूर्ण होऊ न शकणारी प्रलंबित घरकुले प्रधानमंत्री आवास योजना ग्रामीणच्या मार्गदर्शक सूचनांनुसार Refund करुन Remand करणे, तसेच यापुढे प्रलंबित घरकुलांच्या यादीमध्ये नविन घरकुलांचा समावेश होणार नाही याची दक्षता घेणे.

vi. **ग्रामीण गवंडी प्रशिक्षण पूर्ण करणे:-** घरकुलांची गुणवत्ता सुधारण्यासाठी प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण अंतर्गत ग्रामीण गवंडी प्रशिक्षण कार्यक्रमाचे उद्दिष्ट प्रशिक्षण देणाऱ्या संस्था (Training Provider) यांच्याशी समन्वय ठेवून पूर्ण करुन कुशल गवंडी तयार करण्याकरीता पुढील उपाययोजना करणे.

अ) प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण अंतर्गत ग्रामीण गवंडी प्रशिक्षणाच्या उद्दिष्टानुसार गवंडी प्रशिक्षण पूर्ण करुन त्यांचे मुल्यांकन(Assessment) त्वरीत पूर्ण करुन घेणे व सदर माहिती आवास सॉफ्टवर अद्ययावत होईल याची खात्री करणे.

ब) प्रशिक्षित ग्रामीण गवंडी व ग्रामपंचायत क्षेत्रातील इतर उपलब्ध गवंडी यांची ग्रामपंचायतनिहाय यादी तयार करुन त्यांचे पॅनेल बनविणे व या पॅनेलमधील गवंड्यांचा ग्रामीण गृहनिर्माण योजनांमधील घरकुलांच्या बांधकामात सहभाग घेणे.

vii. **डेमो हाऊस** (Demo House) **निर्मिती व उपयोग:-** घरकुलांची गुणवत्ता सुधारण्यासाठी व लाभार्थ्यांना मार्गदर्शक ठरण्यासाठी प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण अंतर्गत डेमो हाऊस निर्मिती व उपयोगाबाबत पुढीलप्रमाणे उपाययोजना करणे.

अ) तालुकास्तरीय अपूर्ण डेमो हाऊसेस पूर्ण करणे, जिल्ह्याच्या Geo-Climatic, Socio-Cultural Conditions व Locally Available Construction Materials चा विचार करुन जिल्हास्तरीय डेमो हाऊसेसची निर्मिती करणे.

ब) तालुकास्तरीय व जिल्हास्तरीय डेमो हाऊसला घरकुल लाभार्थ्यांच्या प्रत्यक्ष भेटींचे आयोजन करणे, प्रत्येक डेमो हाऊसमध्ये माहिती कक्ष किंवा लाभार्थी / महिला स्वयं सहायता गट

यांच्या उत्पादनांच्या विक्रीसाठी महिला स्वयंसहायता गट/ग्रामसंघ/प्रभाग संघ/विविध कार्यकारी सेवा सहकारी संस्था/शेतकरी उत्पादक कंपनी, इ. समुदाय आधारीत संस्थांच्या सहकार्यातून कॉप-शॉप (Co-op Shop) सुरु करणे.

viii. **सर्व ग्रामीण गृहनिर्माण योजनांच्या लाभार्थ्यांचे आधार सिडींग व जॉब कार्ड मॅपिंग पूर्ण करणे**:- प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण व राज्यपुरस्कृत सर्व आवास योजना मधील लाभार्थ्यांचे आधार सिडींग व जॉब कार्ड मॅपिंग पूर्ण करण्यासाठी पुढीलप्रमाणे उपाययोजना करणे.

अ) **प्रधानमंत्री आवास योजना ग्रामीण** मधील सर्व लाभार्थ्यांचे आधार कार्ड व जॉब कार्ड काढून त्यांचे आधार सिडींग व जॉब कार्ड मॅपिंग पूर्ण करणे.

ब) **राज्यपुरस्कृत** रमाई आवास योजना, शबरी आवास योजना, पारधी आवास योजना, आदिम आवास योजना, अटल बांधकाम कामगार आवास योजना, यशवंतराव चव्हाण मुक्त वसाहत योजना मधील सर्व लाभार्थ्यांचे आधार कार्ड व जॉब कार्ड काढून त्यांचे आधार सिडींग व जॉब कार्ड मॅपिंग पूर्ण करणे.

ix. **शासकीय योजनांशी कृतीसंगम (Convergence) करणे :-**

पुढील प्रमाणे शासनाच्या विविध योजनांशी कृतीसंगमातून सर्व ग्रामीण गृहनिर्माण योजनांतील लाभार्थ्यांचे जीवनमान उंचावणे.

अ) ग्रामीण गृहनिर्माण योजनांमधील लाभार्थ्यांना रोजगार मिळवून देण्यासाठी महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना, शौचालय साठी स्वच्छ भारत मिशन-ग्रामीण, नळाने पिण्याच्या पाण्याचा पुरवठा करणेसाठी जल जीवन मिशन, गॅस जोडणी साठी प्रधानमंत्री उज्ज्वला योजना, विद्युत जोडणी साठी सौभाग्य योजना, उपजिविकेचे साधन उपलब्ध करुन देणेसाठी राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती मिशन, उर्जेच्या बचतीसाठी महाराष्ट्र उर्जा विकास अभिकरण (महाउर्जा), इ. शासकीय योजनांशी कृतीसंगम करणे.

ब) तसेच दलित वस्ती सुधार योजना, ठक्कर बाप्पा आदिवासी वस्ती सुधार योजना, जिल्हा परिषद सेस, पंचायत समिती सेस, ग्राम पंचायत सेस, सीएसआर निधी इ. च्या माध्यमातून लाभार्थ्यांना मूलभूत नागरी सुविधा जसे जोडरस्ते, अंतर्गत रस्ते, ड्रेनेज सिस्टीम, पथदिवे, इ. उपलब्ध करुन देणे.

x. **नावीन्यपूर्ण उपक्रम (Innovations / Best Practices) राबविणे :**

ग्रामीण गृहनिर्माण योजनांच्या अंमलबजावणीमध्ये गतिमानता व गुणवत्ता येण्यासाठी पुढीलप्रमाणे नाविन्यपूर्ण उपक्रम राबविणे.

अ) राज्यात प्रत्येक जिल्हा परिषद गटामध्ये किमान एक या प्रमाणे बहुमजली गृहसंकुले (हाऊसिंग अपार्टमेंट) उभारणे आणि त्यांच्या सहकारी संस्था स्थापन करणे.

ब) सर्व ग्रामीण गृहनिर्माण योजनांमधील भूमिहीन लाभार्थ्यांना घरकुल बांधकामाकरीता जागा उपलब्ध करुन देण्यासाठी ग्रामपंचायत स्तरावर विविध मार्गांनी उपलब्ध होणाऱ्या जागांची "लॅण्ड बँक" तयार करणे.

क) सर्व ग्रामीण गृहनिर्माण योजनांमधील लाभार्थ्यांना घरकुल बांधकामाकरीता वाळू उपलब्ध करुन देण्यासाठी प्रत्येक जिल्हा परिषद गटात किमान एक याप्रमाणे "सॅण्ड बँक" ची निर्मिती करणे. तसेच वाळूला पर्याय म्हणून क्रश सॅण्ड, सिमेंट ब्लॉक, फ्लाय ॲश ब्रिक्स, इंटर लॉकींग ब्रिक्स, हॉलो ब्रिक्स, इत्यादींचा वापर करणे.

ड) किमान १०% घरकुल बांधकामासाठी स्थानिक बांधकाम साहित्य, नवनवीन बांधकाम तंत्रज्ञान, किफायतशीर बांधकाम तंत्रज्ञान, नैसर्गिक आपत्ती रोधक तंत्रज्ञान, इ. चा वापर करणे.

इ) किमान १०% घरकुल बांधकामामध्ये फरशी/लादी, रंगरंगोटी, किचन गार्डन/परसबाग, रेन वॉटर हार्वेस्टींग, सौरउर्जा साधने व नेट बिलींग, इ.चा वापर करणे.

४. **"महा आवास अभियान-ग्रामीण २०२१-२२" अंमलबजावणीसाठी क्षमताबांधणी कार्यक्रम:**

**१) "महा आवास अभियान-ग्रामीण २०२१-२२" राज्यस्तरीय शुभारंभ कार्यशाळा:-** अभियानाचा शुभारंभ "राष्ट्रीय आवास दिन" **दिनांक २० नोव्हेंबर २०२१ रोजी** मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांच्या शुभहस्ते, मा.उपमुख्यमंत्री, मा.मंत्री (ग्रामविकास), मा.मंत्री (महसूल, आदिवासी विकास, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य), मा. राज्यमंत्री (ग्राम विकास व महसूल), मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, अतिरिक्त मुख्य सचिव (ग्राम विकास व पंचायत राज विभाग), अतिरिक्त मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव (महसूल विभाग, आदिवासी विकास विभाग, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग), आयुक्त, (आदिवासी विकास, समाज कल्याण, कामगार), संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण यांचे उपस्थितीत राज्यस्तरीय कार्यशाळेचे आयोजनाने होईल.

या कार्यशाळेत सर्व विभागीय आयुक्त, जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद), प्रकल्प संचालक (जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा), राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण कार्यालयातील अधिकारी/कर्मचारी, बँक प्रतिनिधी, मिडीया प्रतिनिधी, इत्यादींना अभियानाबाबत मार्गदर्शन करण्यात येईल.

२) **विभागस्तरीय कार्यशाळा**:- राज्यातील सर्व विभागांमध्ये **दिनांक २१ नोव्हेंबर, २०२१ ते २७ नोव्हेंबर, २०२१ या कालावधीत** संबंधित विभागीय आयुक्त यांचे अध्यक्षतेखाली जिल्ह्यातील जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद), अतिरिक्त आयुक्त/ उपायुक्त (आदिवासी विकास, सामाजिक न्याय, कामगार) यांचे उपस्थितीत विभागस्तरीय कार्यशाळांचे आयोजन करण्यात यावे.

या कार्यशाळांत प्रकल्प संचालक (जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा), प्रकल्प अधिकारी (एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प), सहाय्यक आयुक्त (समाज कल्याण), उप जिल्हा कार्यकारी अधिकारी (महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ), जिल्हा माहिती अधिकारी, गट विकास अधिकारी, विभागीय कार्यालयातील संबंधित अधिकारी/कर्मचारी, बँक प्रतिनिधी, मिडीया प्रतिनिधी, इ. यांना अभियानाबाबत मार्गदर्शन करण्यात येईल. सदर कार्यशाळेस राज्यस्तरावरुन राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण कार्यालयाचे अधिकारी निरीक्षक म्हणून उपस्थित राहतील.

३) **जिल्हास्तरीय कार्यशाळा**:- राज्यातील सर्व जिल्ह्यांमध्ये **दिनांक २८ नोव्हेंबर, २०२१ ते ०४ डिसेंबर, २०२१ या कालावधीत** मा.पालकमंत्री यांचे अध्यक्षतेखाली तसेच मा.अध्यक्ष, जिल्हा परिषद यांचे प्रमुख उपस्थितीत आणि मा. खासदार, मा. आमदार, जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद), प्रकल्प संचालक (जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा), प्रकल्प अधिकारी (एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प), सहाय्यक आयुक्त (समाज कल्याण), उप जिल्हा कार्यकारी अधिकारी (महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ) यांच्या उपस्थितीत जिल्हास्तरीय कार्यशाळांचे आयोजन करण्यात यावे.

या कार्यशाळांत जिल्ह्यातील सर्व पंचायत समिती सभापती, उपसभापती, गट विकास अधिकारी, तहसिलदार, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा कार्यालयातील संबंधित अधिकारी/कर्मचारी, तालुकास्तरीय डाटा एन्ट्री ऑपरेटर, बँक प्रतिनिधी, मिडीया प्रतिनिधी, इ. यांना अभियानाबाबत मार्गदर्शन करण्यात येईल. सदर कार्यशाळेस विभागस्तरावरील अधिकारी हे निरीक्षक म्हणून उपस्थित राहतील.

४) **तालुकास्तरीय कार्यशाळा**:- राज्यातील जिल्ह्यातील सर्व तालुक्यांमध्ये **दिनांक ०५ डिसेंबर, २०२१ ते ११ डिसेंबर, २०२१** या कालावधीत तालुक्याचे मा. आमदार यांचे अध्यक्षतेखाली तसेच पंचायत समिती सभापती, उपसभापती, जिल्हा परीषद सदस्य, पंचायत समिती सदस्य, गट विकास अधिकारी, तहसिलदार यांच्या उपस्थितीत तालुकास्तरीय कार्यशाळांचे आयोजन करण्यात यावे.

या कार्यशाळांत तालुक्यातील सर्व सरपंच, ग्रामसेवक, तलाठी, पंचायत समिती कार्यालयातील संबंधित अधिकारी/कर्मचारी, स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक, ग्रामीण गृहनिर्माण अभियंता, बँक प्रतिनिधी, मिडीया प्रतिनिधी, इत्यादींना अभियानाबाबत मार्गदर्शन करण्यात येईल. सदर कार्यशाळेस जिल्हास्तरावरील संपर्क अधिकारी हे निरीक्षक म्हणून उपस्थित राहतील.

५) **ग्रामस्तरीय कार्यशाळा** :- राज्यात सर्वत्र **दिनांक १२ डिसेंबर, २०२१ ते १८ डिसेंबर, २०२१** या कालावधीत गावस्तरावर सरपंच यांच्या अध्यक्षतेखाली ग्रामपंचायत सदस्य व इतर मान्यवरांच्या उपस्थितीत ग्रामस्तरीय कार्यशाळा आयोजित करुन त्यामध्ये ग्रामसेवक, तलाठी हे अभियानाबाबत सखोल मार्गदर्शन करतील.

या कार्यशाळाद्वारे “महा आवास अभियान-ग्रामीण २०२१-२२” चे यशस्वी अंमलबजावणीसाठी मिळालेली माहिती सर्व लाभार्थी यांना देवून गावातील गतिमान अंमलबजावणीबाबतचे नियोजन करण्यात येईल. सदर कार्यशाळेस तालुकास्तरावरील संपर्क अधिकारी हे निरीक्षक म्हणून उपस्थित राहतील.

६) **ग्राम कृती गटाचे** (Village Action Group) **गठन**:- या ग्रामस्तरीय कार्यशाळेमध्ये प्रत्येक ग्रामपंचायती मध्ये “ग्राम कृती गटाचे गठन” करण्यात यावे. यामध्ये गावातील प्रभावी व्यक्ती, युवक/युवती, इत्यादींचा समावेश करता येईल. उदा. सरपंच, ग्रामसेवक, पोलीस पाटील, शिक्षक, पोलीस इ. प्रभावी व्यक्ती. या गटाने “महा आवास अभियान-ग्रामीण २०२१-२२” मध्ये गावस्तरावर केल्या जाणाऱ्या व करावयाच्या प्रत्यक्ष उपाय योजनांचा पाठपुरावा करुन अभियान १०० टक्के यशस्वी करावयाचे आहे.

७) **लाभार्थी मेळावे**:- गावोगावी लोकप्रतिनिधींच्या उपस्थितीत लाभार्थ्यांचे मेळावे आयोजित करुन लाभार्थ्यांना घरकुल बांधकाम व दर्जाबाबत मार्गदर्शन, प्रोत्साहन देणे, तसेच लाभार्थ्यांना

घरकुल मंजूरी पत्र वितरण करणे, घरकुलाचे भूमिपूजन कार्यक्रम आयोजित करणे, घरकुलांचे हप्ते वितरण कार्यक्रम करणे, गृहप्रवेश कार्यक्रम करणे, इ. सारखे उपक्रम राबविणेत यावेत.

८) **बँक मेळावे**:- तालुकास्तरावर/ गावोगावी बँक अधिकाऱ्यांच्या उपस्थितीत घरासाठी कर्ज घेवू इच्छिणाऱ्या लाभार्थ्यांसाठी बँक मेळाव्याचे आयोजन करुन लाभार्थ्यांना घरकुल बांधण्यासाठी कर्ज उपलब्धतेसाठी प्रयत्न करण्यात यावेत.

५. **"महा आवास अभियान- ग्रामीण २०२१-२२" चा प्रचार व प्रसिध्दीसाठी माहिती शिक्षण व संवाद (IEC) कार्यक्रमः-**

"महा आवास अभियान- ग्रामीण २०२१-२२" अंतर्गत राज्यात राबविण्यात येणाऱ्या विविध घरकुल योजनांबाबत जन जागृती, प्रचार-प्रसिध्दी करण्यासाठी माहिती, शिक्षण व संवाद (IEC) च्या विविध उपक्रमांचा जसे- Mass मिडीया, Outdoor मिडीया, Social मिडीया, Group मिडीया, आंतरव्यक्ती संवाद (IPC), पारंपारीक मिडीया, इ. उपक्रमांचा यथोचीत वापर करण्यात यावा.

६. **अभियानाची प्रभावी अंमलबजावणी, सनियंत्रण व मूल्यमापन**:-

"महा आवास अभियान-ग्रामीण २०२१-२२" च्या प्रभावी अंमलबजावणी, संनियंत्रण व मूल्यमापनासाठी राज्य, विभाग, जिल्हा, तालुका व गाव स्तरावर पुढीलप्रमाणे समित्या कार्यरत राहतील.

**i. राज्यस्तरीय अंमलबजावणी, सनियंत्रण व मूल्यमापन समिती :-**

| अ.क्र. | पद | पदनाम |
|---|---|---|
| १ | अतिरिक्त मुख्य सचिव, ग्राम विकास व पंचायत राज विभाग | अध्यक्ष |
| २ | अतिरिक्त मुख्य सचिव, वित्त विभाग | सदस्य |
| ३ | अतिरिक्त मुख्य सचिव, महसूल व वन विभाग | सदस्य |
| ४ | अतिरिक्त मुख्य सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग | सदस्य |
| ५ | सचिव, आदिवासी विकास विभाग | सदस्य |
| ६ | प्रधान सचिव, इतर मागास बहूजन कल्याण विभाग | सदस्य |
| ७ | प्रधान सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग | सदस्य |
| ८ | प्रधान सचिव, सहकार व पणन विभाग | सदस्य |
| ९ | संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृह निर्माण | सदस्य सचिव |

**ii. विभागस्तरीय अंमलबजावणी, सनियंत्रण व मूल्यमापन समिती :-**

| अ.क्र. | पद | पदनाम |
|---|---|---|
| १ | विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय | अध्यक्ष |
| २ | अपर आयुक्त, आदिवासी विकास | सदस्य |
| ३ | अपर कामगार आयुक्त/ कामगार उपायुक्त | सदस्य |
| ४ | विभागीय उप आयुक्त, समाज कल्याण | सदस्य |
| ५ | उपआयुक्त (महसूल), विभागीय आयुक्त कार्यालय | सदस्य |
| ६ | उपआयुक्त (पुरवठा), विभागीय आयुक्त कार्यालय | सदस्य |
| ७ | विभागीय सह निबंधक, सहकारी संस्था | सदस्य |
| ८ | बँक क्षेत्रीय अधिकारी | सदस्य |
| ९ | उपआयुक्त (विकास), विभागीय आयुक्त कार्यालय | सदस्य सचिव |

**iii. जिल्हास्तरीय अंमलबजावणी, सनियंत्रण व मूल्यमापन समिती :-**

| अ.क्र. | पद | पदनाम |
|---|---|---|
| १ | कार्यकारी अध्यक्ष, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | अध्यक्ष |
| २ | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प | सदस्य |
| ३ | सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण | सदस्य |
| ४ | उपजिल्हा कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ | सदस्य |
| ५ | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत), जिल्हा परिषद | सदस्य |
| ६ | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग) | सदस्य |
| ७ | निवासी उप जिल्हाधिकारी | सदस्य |
| ८ | जिल्हा पुरवठा अधिकारी | सदस्य |
| ९ | जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था | सदस्य |
| १० | जिल्हा माहिती अधिकारी | सदस्य |
| ११ | लीड बँकर्स / बँक प्रतिनिधी | सदस्य |
| १२ | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा | सदस्य सचिव |

**iv. तालुकास्तरीय अंमलबजावणी, सनियंत्रण व मूल्यमापन समिती :-**

| अ.क्र. | पद | पदनाम |
|---|---|---|
| १ | गट विकास अधिकारी, पंचायत समिती | अध्यक्ष |
| २ | तहसिलदार | सदस्य |
| ३ | तालुका सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था | सदस्य |
| ४ | उप अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद | सदस्य |
| ५ | उप अभियंता (पाणी पुरवठा), जिल्हा परिषद | सदस्य |
| ६ | विस्तार अधिकारी, पंचायत | सदस्य |
| ७ | स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक/ ग्रामीण गृहनिर्माण अभियंता | सदस्य |
| ८ | राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियान चे प्रतिनिधी | सदस्य |
| ९ | बँक प्रतिनिधी | सदस्य |
| १० | विस्तार अधिकारी, संबंधित | सदस्य सचिव |

**vi. ग्रामपंचायतस्तरीय अंमलबजावणी, सनियंत्रण व मूल्यमापन समिती :-**

| अ.क्र. | पद | पदनाम |
|---|---|---|
| १ | सरपंच,ग्रामपंचायत | अध्यक्ष |
| २ | उप सरपंच, ग्रामपंचायत | सदस्य |
| ३ | ग्राम रोजगार सेवक, मनरेगा | सदस्य |
| ४ | तलाठी | सदस्य |
| ५ | महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी चे प्रतिनिधी | सदस्य |
| ६ | राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियान चे प्रतिनिधी | सदस्य |
| ७ | ग्राम विकास अधिकारी /ग्रामसेवक, ग्रामपंचायत | सदस्य सचिव |

वरील अंमलबजावणी, संनियंत्रण व मूल्यमापन समित्या राज्यस्तर, विभागस्तर, जिल्हास्तर, तालुकास्तर व गावपातळीवरुन क्षमता बांधणी कार्यशाळा, आढावा बैठका, क्षेत्रिय भेटी (Field Visits), Awaas Soft, MIS Formats, इ. द्वारे अभियानाचे संनियंत्रन व मूल्यमापन करतील.

७. **"महा आवास अभियान- ग्रामीण २०२१-२२" कालावधीतील उत्कृष्ट कार्याचा गौरवः-** "महा आवास अभियान -ग्रामीण २०२१-२२" मध्ये उत्कृष्ट काम करणाऱ्या संस्था व व्यक्तींना पुढीलप्रमाणे "**महा आवास अभियान पुरस्कार २०२१-२२**" देऊन गौरविण्यात येईल. पुरस्काराचे स्वरुप, पुरस्कार वितरण कार्यक्रमाचे वेळापत्रक इत्यादी बाबत स्वतंत्रपणे कळविण्यात येईल.

**अ. राज्यस्तरीय पुरस्कार :-**

**I. प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण**

i. सर्वोत्कृष्ट विभाग- प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
ii. सर्वोत्कृष्ट जिल्हे - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
iii. सर्वोत्कृष्ट तालुके - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
iv. सर्वोत्कृष्ट ग्रामपंचायत - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
v. सर्वोत्कृष्ट बहुमजली इमारत, सर्वोत्कृष्ट गृहसंकुल व बहुमजली गृहसंकुल (हाऊसिंग अपार्टमेंट) - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.

**II. राज्य पुरस्कृत आवास योजना**

i. सर्वोत्कृष्ट विभाग- प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
ii. सर्वोत्कृष्ट जिल्हे - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
iii. सर्वोत्कृष्ट तालुके - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
iv. सर्वोत्कृष्ट ग्रामपंचायत - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
v. सर्वोत्कृष्ट बहुमजली इमारत, सर्वोत्कृष्ट गृहसंकुल व बहुमजली गृहसंकुल (हाऊसिंग अपार्टमेंट) - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.

**ब. विभागस्तरीय पुरस्कार :-**

**I. प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण**

i. सर्वोत्कृष्ट जिल्हे - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
ii. सर्वोत्कृष्ट तालुके - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
iii. सर्वोत्कृष्ट ग्रामपंचायत - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
iv. शासकीय जागा उपलब्धता व वाळू उपलब्धता सर्वोत्कृष्ट कामगिरी करणारे तालुके - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.

**II. राज्य पुरस्कृत आवास योजना**

i. सर्वोत्कृष्ट जिल्हे - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
ii. सर्वोत्कृष्ट तालुके - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
iii. सर्वोत्कृष्ट ग्रामपंचायत - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
iv. शासकीय जागा उपलब्धता व वाळू उपलब्धता सर्वोत्कृष्ट कामगिरी करणारे तालुके - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.

**क. जिल्हास्तरीय पुरस्कार :-**

**I. प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण**

i. सर्वोत्कृष्ट तालुके - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
ii. सर्वोत्कृष्ट क्लस्टर - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
iii. सर्वोत्कृष्ट ग्रामपंचायत - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.

**II. राज्य पुरस्कृत आवास योजना**

iv. सर्वोत्कृष्ट तालुके - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
v. सर्वोत्कृष्ट क्लस्टर - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
vi. सर्वोत्कृष्ट ग्रामपंचायत - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.

**ड. तालुकास्तरीय पुरस्कार :-**

**I. प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण**

i. सर्वोत्कृष्ट क्लस्टर - प्रथम क्रमांक.
ii. सर्वोत्कृष्ट ग्रामपंचायत - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
iii. सर्वोत्कृष्ट घरकुल - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.

**II. राज्य पुरस्कृत आवास योजना**

i. सर्वोत्कृष्ट क्लस्टर - प्रथम क्रमांक.
ii. सर्वोत्कृष्ट ग्रामपंचायत - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
iii. सर्वोत्कृष्ट घरकुल - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.

**इ. ग्रामपंचायतस्तरीय पुरस्कार :-**

**I. प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण**

i. सर्वोत्कृष्ट घरकुल - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.

**II. राज्य पुरस्कृत आवास योजना**

i. सर्वोत्कृष्ट घरकुल - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.

८. **"महा आवास अभियान-ग्रामीण २०२१-२२" कालावधीत राबविण्यात आलेल्या उपक्रमांचे मूल्यमापन**:- २० नोव्हेंबर २०२१ ते ३१ मार्च २०२२ हा अभियान कालावधी संपल्यावर अभियानात राबविण्यात आलेल्या उपक्रमांचे मूल्यमापन करण्यात येईल. या मूल्यमापनाच्या आधारे राज्य, विभाग, जिल्हा, तालुका, ग्रामस्तरावर उत्कृष्ट कामासाठीच्या पुरस्कारांची नामांकने काढण्यात येतील. परिच्छेद

७ मध्ये नमूद विविध स्तरावरील उत्कृष्ट कामासाठीच्या पुरस्कारांची नामांकने खालीलप्रमाणे समित्याव्दारे निवडण्यात येतील.

| पुरस्कार नामांकने | उत्कृष्ट कामासाठीच्या पुरस्कारांची नामांकने निवडण्यासाठी समित्या |
|---|---|
| राज्यस्तरीय पुरस्कारांची निवड | राज्यस्तरीय अंमलबजावणी, संनियंत्रण व मूल्यमापन समिती |
| विभागस्तरीय पुरस्कारांची निवड | विभागस्तरीय अंमलबजावणी, संनियंत्रण व मूल्यमापन समिती |
| जिल्हास्तरीय पुरस्कारांची निवड | जिल्हास्तरीय अंमलबजावणी, संनियंत्रण व मूल्यमापन समिती |
| तालुकास्तरीय पुरस्कारांची निवड | तालुकास्तरीय अंमलबजावणी, संनियंत्रण व मूल्यमापन समिती |
| ग्रामपंचायतस्तरीय पुरस्कारांची निवड | तालुकास्तरीय अंमलबजावणी, संनियंत्रण व मूल्यमापन समिती |

मूल्यमापनाचे निकष सोबत “परिशिष्ट - अ” व “ परिशिष्ट-ब” मध्ये देण्यात आले आहेत.

९. आपत्कालीन व्यवस्थापन, मदत व पुर्नवसन या विभागाचे “कोवीड-१९ च्या व्यवस्थापनाबाबत राष्ट्रीय मार्गदर्शक सूचना” या मथळ्याखाली नमूद सर्व सूचना तसेच सार्वजनिक आरोग्य विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशातील सर्व सूचनांचे काटेकोर पालन करावे.

**१०. “महा आवास अभियान - ग्रामीण २०२१-२२” अंमलबजावणीसाठीचा खर्च प्रधानमंत्री आवास योजना - ग्रामीण व राज्य पुरस्कृत योजना यांच्या प्रशासकीय निधीतून करण्यात यावा.**

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११११६१३०४२८४२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun Vasant Shinde

Digitally signed by Arun Vasant Shinde
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Industries Energy & Labour Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=213d983c0c3b73519fa14c37396dd0b3cf8f28e16bc2fb6620a5c4fdac6e7284, serialNumber=672d36cc7468aa812e66dbb4704ffeb120dd58831284824f4fbec2a6f6602199, cn=Arun Vasant Shinde
Date: 2021.11.16 16:19:23 +05'30'

**(अरुण व. शिंदे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.

२. मा. सभापती, विधान परिषद यांचे खासगी सचिव.

३. मा. अध्यक्ष, विभानसभा यांचे खासगी सचिव.

४. मा. मुख्यमंत्री यांचे अतिरिक्त मुख्य सचिव व प्रधान सचिव.

५. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव.

६. मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा/ विधान परिषद यांचे खासगी सचिव.

७. मा. मंत्री (ग्राम विकास) यांचे खासगी सचिव.

८. मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खासगी सचिव.

९. मा. सर्व पालकमंत्री तथ मंत्री यांचे खाजगी सचिव.

१०.मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव.

११.अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, नियोजन/ वित्त/ सामाजिक न्याय/ आदिवासी विकास/ गृहनिर्माण विभाग.

१२.संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

१३.आदिवासी विकास आयुक्त, नाशिक.

१४.समाज कल्याण आयुक्त, पुणे.

१५.कामगार आयुक्त, मुंबई.

१६.सर्व विभागीय आयुक्त.

१७.सर्व जिल्हाधिकारी.

१८. सर्व कार्यकारी अध्यक्ष, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.

१९.सर्व उपायुक्त (विकास), विभागीय आयुक्त कार्यालय.

२०.संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय.

२१.कार्यासन अधिकारी, योजना- १०, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मुंबई.

२२.सर्व गट विकास अधिकारी, पंचायत समिती.

२३.सर्व सरपंच, ग्रामपंचायत.

२४.निवड नस्ती.

परिशिष्ट अ

## राज्य, विभाग, जिल्हा, तालुकास्तरीय पुरस्कार निवडीसाठीचे निकष

| अ. क्र. | राबविलेले उपक्रम | पारितोषिकासाठी निवडीचे निकष | कमाल गुण | गुणांकन पध्दती (टक्केवारीच्या प्रमाणात गुण देण्यात येतील) |
|---|---|---|---|---|
| १. | भूमीहीन लाभार्थ्यांना जागा उपलब्ध करुन देणे. | केंद्र व राज्य पुरस्कृत घरकुल योजनांतर्गत सन २०१६-१७ ते २०२१-२२ या कालावधीमधील पात्र व भूमीहीन लाभार्थ्यांना ०६ जून २०२१ ते अभियान समाप्तीपर्यतच्या कालावधीमध्ये शासनाच्या विविध योजना वा इतर मार्गाने जागा उपलब्ध करुन देणे.<br>अ) पंडीत दीनदयाळ उपाध्याय घरकुल जागा खरेदी अर्थसहाय्य योजना, शासकीय जागा विनामूल्य उपलब्ध करण्याची योजना, ग्रामीण भागातील अतिक्रमणे नियमानुकूल करण्याची योजना व इतर मार्ग - उदा. बक्षीसपत्र, भाडेपट्टा, इ. प्रभावीपणे राबविणे. | ०५ | एकूण पात्र व भूमीहीन लाभार्थ्यांपैकी किती लाभार्थ्यांना ०६ जून २०२१ ते अभियान समाप्तीपर्यतच्या कालावधीमध्ये जागा उपलब्ध करुन दिली, त्या प्रमाणात गुण देण्यात येतील. (उदा. ७५% भूमीहीन लाभार्थ्यांना जागा उपलब्ध करुन दिल्यास ३.७५ गुण) |
| | | ब) कमी जागेत जास्त लाभार्थी सामावण्यासाठी राज्यात प्रत्येक जिल्हा परिषद गटामध्ये किमान एक याप्रमाणे बहुमजली इमारती व गृहसंकुले उभारणे. | ०५ | उद्दिष्टापैकी ०६ जून २०२१ ते अभियान समाप्तीपर्यतच्या कालावधीमध्ये पूर्ण झालेल्या बहुमजली इमारतीसाठी २ व गृहसंकुले उभारणे साठी ३ या प्रमाणात गुण देण्यात येतील. (उदा. बहुमजली इमारतीचे ५०% उद्दिष्ट पूर्ण झाल्यास १ गुण व गृहसंकुलाचे ५०% उद्दिष्ट पूर्ण झाल्यास १.५ गुण) |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २. | **घरकुलांच्या** उद्दिष्टांप्रमाणे १०० टक्के मंजूरी देणे. | केंद्र व राज्य पुरस्कृत योजनांतर्गत सन २०१६-१७ ते २०२१-२२ या कालावधीमध्ये जिल्ह्यांना वितरीत करण्यात आलेल्या घरकुल उद्दिष्टांना ०६ जून २०२१ ते अभियान समाप्तीपर्यतच्या कालावधीमध्ये १०० टक्के मंजूरी देणे.<br>अ) घरकुल लाभार्थ्यांची नोंदणी (Registration), Geo tagging, Account Verification, इ. प्रक्रिया किमान कालावधीत पूर्ण करुन मंजूरी देणे. | ०५ | उद्दिष्टापैकी ०६ जून २०२१ ते अभियान समाप्तीपर्यतच्या कालावधीमध्ये मंजूरी दिलेल्या घरकुलांच्या प्रमाणात गुण देण्यात येतील. (उदा. ८०% घरकुलांना मंजूरी दिल्यास ४ गुण) |
| | | ब) लाभार्थ्यांना घरकुल मंजूरीचे पत्र त्वरीत वितरीत करणे, घरकुलाचे काम तात्काळ सुरु करणेबाबत सूचना देणे, घरकुल बांधकामाबाबत तांत्रिक मार्गदर्शन करणे व भूमिपुजन कार्यक्रम करुन घरकुलाचे बांधकाम सुरु करणे. | ०५ | उद्दिष्टापैकी ०६ जून २०२१ ते अभियान समाप्तीपर्यतच्या कालावधीमध्ये मंजूरी दिलेल्या घरकुलांपैकी किती घरकुलांनी प्रत्यक्ष बांधकामास सुरुवात केली या प्रमाणात गुण देण्यात येतील. (उदा. मंजूर घरकुलांपैकी ८०% घरकुलांनी प्रत्यक्ष बांधकामास सुरुवात केल्यास ४ गुण) |
| ३. | मंजूर घरकुलांना पहिल्या हप्त्याचे १०० टक्के वितरण करणे. | केंद्र व राज्य पुरस्कृत योजनांतर्गत सन २०१६-१७ ते २०२१-२२ या कालावधीमध्ये मंजूरी दिलेल्या सर्व घरकुलांना ०६ जून २०२१ ते अभियान समाप्तीपर्यतच्या कालावधीमध्ये पहिला हप्ता विनाविलंब वितरीत करणे.<br>अ) घरकुलास मंजूरी दिलेल्या लाभार्थ्यांना **७** दिवसाच्या आत पहिल्या हप्त्याचे वितरण करणे **व** | ०५ | मंजूर घरकुलांपैकी ०६ जून २०२१ ते अभियान समाप्तीपर्यतच्या कालावधीमध्ये पहिला हप्ता दिलेल्या घरकुलांच्या प्रमाणात गुण देण्यात येतील. (उदा. ६०% घरकुलांना पहिला हप्ता वितरीत केल्यास ३ गुण) |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | स्थानिक स्तरावर पहिला हप्ता वितरण कार्यक्रमाचे आयोजन करणे. | | |
| | | ब) पहिला हप्ता वितरण झाल्याबरोबर तात्काळ मनरेगा मस्टर जनरेट करणेबाबतची कार्यवाही करणे. | ०५ | ०६ जून २०२१ ते अभियान समाप्तीपर्यतच्या कालावधीमध्ये पहिला हप्ता वितरण केलेल्या घरकुलांपैकी किती घरकुलाचे मनरेगा मस्टर जनरेट झाले त्या प्रमाणात गुण देण्यात येतील. (उदा. ६०% घरकुलांचे मस्टर जनरेट झाल्यास ३ गुण) |
| ४. | मंजूर घरकुले भौतिक व आर्थिक दृष्ट्या पूर्ण करणे. | केंद्र व राज्य पुरस्कृत योजनांतर्गत सन २०१६-१७ ते २०२१-२२ मधील सर्व मंजूर घरकुलांचे काम ०६ जून २०२१ ते अभियान समाप्तीपर्यतच्या कालावधीमध्ये भौतिक व आर्थिक दृष्ट्या पूर्ण करणे.<br>अ) राज्यात महिला स्वयंसहायता गट/ग्राम संघ/प्रभाग संघ/विविध कार्यकारी सेवा सहकारी संस्था/शेतकरी उत्पादक कंपनी, इ. समुदाय आधारीत संस्थाद्वारे प्रत्येक जिल्हा परिषद गटामध्ये किमान एक घरकुल मार्ट सुरु करुन त्याद्वारे घरकुलाचे बांधकाम साहित्य जसे - दगड, विटा, वाळू, सिमेंट, दारे, खिडक्या, छताचे साहित्य, इ. उपलब्ध करणे, किमान कालावधीमध्ये घरकुले भौतिकदृष्टया पूर्ण करण्यासाठी सरपंच, ग्रामसेवक/ग्राम विकास अधिकारी, ग्रामीण गृहनिर्माण | १० | मंजूरी देण्यात आलेल्या घरकुलांपैकी ०६ जून २०२१ ते अभियान समाप्तीपर्यतच्या कालावधीमध्ये भौतिकदृष्ट्या पूर्ण झालेल्या घरकुलांच्या प्रमाणात गुण देण्यात येतील. (उदा. मंजूरी देण्यात आलेल्या घरकुलांपैकी ८०% घरकुले पूर्ण झाल्यास ८ गुण) |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | अभियंता यांनी घरकुलांना वेळोवळी भेटी देणे, आवास ॲपद्वारे घरकुल बांधकामाचे टप्पानिहाय फोटो अपलोड करणे, मनरेगा मस्टर जनरेट करणे व मंजूर केलेली सर्व घरकुले १०० ते १२० दिवसात पूर्ण करणे. | | |
| | | ब) सर्व घरकुले आर्थिकदृष्ट्या पूर्ण करण्यासाठी लाभार्थ्यांना घरकुल बांधकामाच्या भौतिक प्रगतीनुसार टप्पानिहाय सर्व हप्ते किमान कालावधीत वितरीत करणे. तसेच गरजेप्रमाणे इच्छूक लाभार्थ्यांना वित्तीय संस्थांकडून गृहकर्जे मिळवूण देणे. | १० | ०६ जून २०२१ ते अभियान समाप्तीपर्यतच्या कालावधीत भौतिक प्रगतीनुसार पूर्ण घरकुलांचे सर्व हप्ते वितरीत केल्यास आर्थिकदृष्ट्या पूर्ण घरकुलांच्या प्रमाणात गुण देण्यात येतील. (उदा.५०% भौतिकदृष्ट्या पूर्ण घरकुलांचे हप्ते वितरीत केल्यास ५ गुण) |
| ५. | ग्रामीण गवंडी प्रशिक्षण पूर्ण करणे. | घरकुलांची गुणवत्ता सुधारण्यासाठी प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण अंतर्गत ग्रामीण गवंडी प्रशिक्षण कार्यक्रमाचे उद्दिष्ट प्रशिक्षण देणाऱ्या संस्था (Training Provider) यांच्याशी समन्वय ठेवून पूर्ण करुन कुशल गवंडी तयार करणे.<br>अ) प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण अंतर्गत ग्रामीण गवंडी प्रशिक्षणाच्या उद्दिष्टानुसार गवंडी प्रशिक्षण पूर्ण करुन त्यांचे मुल्यांकन(Assessment) त्वरीत पूर्ण करुन घेणे व सदर माहिती आवास सॉफ्टवर अद्ययावत होईल याची खात्री करणे. | ०५ | ०६ जून २०२१ ते अभियान समाप्तीपर्यतच्या कालावधीत ग्रामीण गवंडी प्रशिक्षणासाठी दिलेल्या उद्दिष्टानुसार घरकुलांना मंजूरी देणे, प्रशिक्षणास सुरुवात, प्रशिक्षण पूर्ण, मुल्यांकन शुल्क प्रदान, मुल्यांकनासहीत पूर्ण या पाच टप्प्यावर प्रत्येकी १ गुण या प्रमाणे एकूण ५ गुण देण्यात येतील. (उदा. ग्रामीण गवंडी प्रशिक्षणासाठी दिलेल्या उद्दिष्टापैकी ८०% घरकुलांना मंजूरी देण्याची कार्यवाही पूर्ण झाल्यास ०.८ गुण तर १००% कार्यवाही पूर्ण झाल्यास १ गुण, ७०% प्रशिक्षणास सुरुवात |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | झाल्यास ०.७% गुण तर १००% प्रशिक्षणास सुरुवात झाल्यास १ गुण या प्रमाणे टप्पानिहाय) |
| | | ब) प्रशिक्षित ग्रामीण गवंडी व ग्रामपंचायत क्षेत्रातील इतर उपलब्ध गवंडी यांची ग्रामपंचायतनिहाय यादी तयार करुन त्यांचे पॅनेल बनविणे व या पॅनेलमधील गवंड्यांचा ग्रामीण गृहनिर्माण योजनांमधील घरकुलांच्या बांधकामात सहभाग घेणे. | ०५ | प्रशिक्षित ग्रामीण गवंडी व ग्रामपंचायत क्षेत्रातील इतर उपलब्ध गवंडी यांची ०६ जून २०२१ ते अभियान समाप्तीपर्यतच्या कालावधीत ग्रामपंचायतनिहाय यादी तयार करुन त्यांचे पॅनेल बनविल्यास ३ गुण (प्रशिक्षित गवंड्यांपैकी ५०% गवंड्यांचा यादीमध्ये समावेश असल्यास १.५ गुण) व या पॅनेलमधील गवंड्यांचा ग्रामीण गृहनिर्माण योजनांमधील घरकुलांच्या बांधकामात सहभागी करुन घेतल्यास २ गुण (पॅनेलमधील ५०% गवंड्यांना ग्रामीण गृहनिर्माण योजनांमधील घरकुलांच्या बांधकामात सहभागी करुन घेतल्यास १ गुण) या प्रमाणात गुण देण्यात येतील. |
| ६. | डेमो हाऊसेस निर्मिती व उपयोग. | घरकुलांची गुणवत्ता सुधारण्यासाठी व लाभार्थ्यांना मार्गदर्शक ठरण्यासाठी प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण अंतर्गत डेमो हाऊस निर्मिती करणे व त्यांचा उपयोग करणे<br>अ) तालुकास्तरीय अपूर्ण डेमो हाऊसेस पूर्ण करणे, जिल्ह्याच्या Geo-Climatic, Socio- Cultural Conditions व Locally Available | ०५ | ०६ जून २०२१ ते अभियान समाप्तीपर्यतच्या कालावधीत डेमो हाऊसेसच्या उद्दिष्टानुसार बांधकामास सुरुवात, जोत्यापर्यंत पूर्ण, लिंटल लेव्हल पर्यंत पूर्ण, छतापर्यंत पूर्ण, बांधकाम पूर्ण या पाच टप्प्यावर प्रत्येकी १ गुण या प्रमाणे एकूण ५ गुण देण्यात येतील. (उदा. डेमो हाऊसच्या दिलेल्या |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | Construction Materials चा विचार करुन जिल्हास्तरीय डेमो हाऊसेसची निर्मिती करणे. | | उद्दिष्टापैकी ५०% डेमो हाऊसच्या बांधकामास सुरुवात झाली असल्यास ०.५ गुण आणि उद्दिष्टापैकी १००% डेमो हाऊसेसच्या बांधकामास सुरुवात झाल्यास १ गुण या प्रमाणे टप्पानिहाय). |
| | | ब) तालुकास्तरीय व जिल्हास्तरीय डेमो हाऊसला घरकुल लाभार्थ्यांच्या प्रत्यक्ष भेटींचे आयोजन करणे, प्रत्येक डेमो हाऊसमध्ये माहिती कक्ष किंवा लाभार्थी / महिला स्वयं सहायता गट यांच्या उत्पादनांच्या विक्रीसाठी महिला स्वयंसहायता गट/ग्रामसंघ/प्रभाग संघ/विविध कार्यकारी सेवा सहकारी संस्था/शेतकरी उत्पादक कंपनी, इ. समुदाय आधारीत संस्थांच्या सहकार्यातून कॉप-शॉप (Co-op Shop) सुरु करणे. | ०५ | डेमो हाऊसेसच्या उद्दिष्टानुसार तालुकास्तरीय व जिल्हास्तरीय डेमो हाऊसमध्ये माहिती कक्ष किंवा लाभार्थी / महिला स्वयं सहायता गट यांच्या उत्पादनांच्या विक्रीसाठी कॉप-शॉप, इ. सुरु केल्याच्या प्रमाणात गुण देण्यात येतील. (उदा. डेमो हाऊसच्या दिलेल्या उद्दिष्टापैकी ५०% डेमो हाऊसमध्ये लाभार्थी / महिला स्वयं सहायता गट यांच्या उत्पादनांच्या विक्रीसाठी कॉप-शॉप, माहिती कक्ष, इ. सुरु केल्यास २.५ गुण) |
| ७. | सर्व ग्रामीण गृहनिर्माण योजनांच्या लाभार्थ्यांचे आधार सिडींग व जॉब कार्ड मॅपिंग पूर्ण करणे. | अ) प्रधानमंत्री आवास योजना ग्रामीण मधील सर्व लाभार्थ्यांचे आधार कार्ड व जॉब कार्ड काढून त्यांचे आधार सिडींग व जॉब कार्ड मॅपिंग पूर्ण करणे. | ०५ | ०६ जून २०२१ ते अभियान समाप्तीपर्यतच्या कालावधीत प्रधानमंत्री आवास योजना ग्रामीण मधील सर्व लाभार्थ्यांचे आधार कार्ड काढल्यास २ गुण व त्यांचे आधार सिडींग व जॉब कार्ड मॅपिंग पूर्ण केल्यास ३ गुण याप्रमाणे ५ पैकी गुण देण्यात येतील. (उदा. ७५% काम पूर्ण झाल्यास ३.७५ गुण). |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | ब) राज्यपुरस्कृत रमाई आवास योजना, शबरी आवास योजना, पारधी आवास योजना, आदिम आवास योजना, अटल बांधकाम कामगार आवास योजना, यशवंतराव चव्हाण मुक्त वसाहत योजना मधील सर्व लाभार्थ्यांचे आधार कार्ड व जॉब कार्ड काढून त्यांचे आधार सिडींग व जॉब कार्ड मॅपिंग पूर्ण करणे. | ०५ | ०६ जून २०21 ते अभियान समाप्तीपर्यतच्या कालावधीत राज्यपुरस्कृत आवास योजना ग्रामीण मधील सर्व लाभार्थ्यांचे आधार कार्ड काढल्यास २ गुण व त्यांचे आधार सिडींग व जॉब कार्ड मॅपिंग पूर्ण केल्यास ३ गुण याप्रमाणे ५ पैकी गुण देण्यात येतील. (उदा. ७५**%** काम पूर्ण झाल्यास ३.७५ गुण). |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ८. | शासकीय योजनांशी करणे. | **शासकीय योजनांशी कृतीसंगम करुन लाभार्थ्यांना-**<br>अ) ग्रामीण गृहनिर्माण योजनांमधील लाभार्थ्यांना रोजगार मिळवून देण्यासाठी महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना, शौचालय साठी स्वच्छ भारत मिशन-ग्रामीण, नळाने पिण्याच्या पाण्याचा पुरवठा करणेसाठी जल जीवन मिशन, गॅस जोडणी साठी प्रधानमंत्री उज्ज्वला योजना, विद्युत जोडणी साठी सौभाग्य योजना, उपजिविकेचे साधन उपलब्ध करुन देणेसाठी राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती मिशन, उर्जेच्या बचतीसाठी महाराष्ट्र उर्जा विकास अभिकरण (महाउर्जा), इ. शासकीय योजनांशी कृतीसंगम करणे.<br>ब) दलित वस्ती सुधार योजना, ठक्कर बाप्पा आदिवासी वस्ती सुधार योजना, जिल्हा परिषद सेस, पंचायत समिती सेस, ग्राम पंचायत सेस, सीएसआर निधी इ. च्या माध्यमातून लाभार्थ्यांना मूलभूत नागरी सुविधा जसे जोडरस्ते, अंतर्गत रस्ते, ड्रेनेज सिस्टीम, पथदिवे, इ. उपलब्ध करुन देणे. | १० | नमूद शासकीय योजनांशी कृतीसंगम (Convergence) मधील १० बाबींसाठी प्रत्येकी १ गुण (मुद्दा क्रमांक (अ)(i) साठी १ गुण) या प्रमाणे १० गुणांपैकी गुण देण्यात येतील. (उदा. जल जीवन मिशन मधून नळाने पिण्याच्या पाण्याचा पुरवठा करणे उद्दिष्टापैकी ८०% उद्दिष्ट पूर्ण झाल्यास ०.८ गुण या प्रमाणे प्रत्येक बाबीसाठी १ पैकी गुण देऊन एकूण १० पैकी गुण देण्यात येतील.) |
| ९ | नावीन्यपूर्ण उपक्रम राबविणे | ग्रामीण गृहनिर्माण योजनांच्या अंमलबजावणीमध्ये गतिमानता व गुणवत्ता येण्यासाठी पुढीलप्रमाणे नाविन्यपूर्ण उपक्रम राबविणे. | १० | नमूद नाविन्यपूर्ण उपक्रम अंमलबजावणी मधील ५ बाबींसाठी प्रत्येकी २ गुण या प्रमाणे १० गुणांपैकी गुण देण्यात |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | अ) राज्यात प्रत्येक जिल्हा परिषद गटामध्ये किमान एक या प्रमाणे बहुमजली गृहसंकुले (हाऊसिंग अपार्टमेंट) उभारणे आणि त्यांच्या सहकारी संस्था स्थापन करणे.<br>ब) सर्व ग्रामीण गृहनिर्माण योजनांमधील भूमिहीन लाभार्थ्यांना घरकुल बांधकामाकरीता जागा उपलब्ध करुन देण्यासाठी ग्रामपंचायत स्तरावर विविध मार्गांनी उपलब्ध होणाऱ्या जागांची -लॅण्ड बँक॰ तयार करणे.<br>क) सर्व ग्रामीण गृहनिर्माण योजनांमधील लाभार्थ्यांना घरकुल बांधकामाकरीता वाळू उपलब्ध करुन देण्यासाठी प्रत्येक जिल्हा परिषद गटात किमान एक याप्रमाणे -सॅण्ड बँक ची निर्मिती **करणे**. तसेच वाळूला पर्याय म्हणून क्रश सॅण्ड, सिमेंट ब्लॉक, फ्लाय ॲश ब्रिक्स, इंटर लॉकींग ब्रिक्स, हॉलो ब्रिक्स, इत्यादींचा वापर करणे.<br>ड) किमान १०% घरकुल बांधकामासाठी स्थानिक बांधकाम साहित्य, नवनवीन बांधकाम तंत्रज्ञान, किफायतशीर बांधकाम तंत्रज्ञान, नैसर्गिक आपत्ती रोधक तंत्रज्ञान, इ. चा वापर करणे.<br>इ) किमान १०% घरकुल बांधकामामध्ये फरशी/लादी, रंगरंगोटी,किचन गार्डन/परसबाग, | | येतील. (उदा. बहुमजली गृहसंकुल (हाऊसिंग अपार्टमेंट) उभारणे उद्दिष्टापैकी ८०% उद्दिष्ट पूर्ण झाल्यास १.६ गुण या प्रमाणे प्रत्येक बाबीसाठी २ पैकी गुण देऊन एकूण १० पैकी गुण देण्यात येतील.) |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | रेन वॉटर हार्वेस्टींग, सौरउर्जा साधने व नेट बिलींग, इ.चा वापर करणे. | | |
| | | **एकूण गुण** | १०० | |
| १० | प्रलंबित घरकुले (Delayed House) पूर्ण करणे. | प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण अंतर्गत घरकुलांना पहिला हप्ता प्रदान केल्यापासून १२ महिन्यापेक्षा जास्त कालावधी झालेल्या, मात्र अद्यापपर्यंत अपूर्ण असलेली प्रलंबित घरकुले (Delayed Houses) प्राधान्याने पूर्ण करणे.<br>अ) प्रलंबित घरकुलांच्या यादीनुसार घरकुले प्रलंबित राहण्यामागची कारणे शोधून त्या कारणांचे विश्लेषण करुन त्यावर उपाययोजना करणे व प्राधान्याने सदर घरकुले पूर्ण करणे, याकामी गरजेप्रमाणे तालुका कायदेविषयक सहाय्य व सल्ला समितीच्या सहाय्याने **-लोक अदालत**॰ द्वारे लाभार्थ्यांना घरकुल पूर्ण करण्यासाठी प्रवृत्त करणे.<br>ब) पूर्ण होऊ न शकणारी प्रलंबित घरकुले प्रधानमंत्री आवास योजना ग्रामीणच्या मार्गदर्शक सूचनांनुसार Refund करुन Remand करणे, तसेच यापुढे प्रलंबित घरकुलांच्या यादीमध्ये नविन घरकुलांचा समावेश होणार नाही याची दक्षता घेणे. | -१० | अभियान संपताना Performance Index मध्ये असलेले निगेटिव्ह यास १० ने गुणून येणारे गुण एकूण गुणातून वजा करण्यात येतील. |

- **<u>टिप</u>** :-

१. उपरोक्त सर्व अ.क्र.१ ते १० हे निकष प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीणसाठी लागू राहतील व अ.क्र.१ ते ४ व ७ ते ९ हे निकष राज्य पुरस्कृत आवास योजनांसाठी लागू राहतील.

२. उपरोक्त विवरणपत्रामधील उपक्रम क्र.१ भूमीहीन लाभार्थ्यांना जागा उपलब्ध करुन देणे व उपक्रम क्रमांक ५ ग्रामीण गवंडी प्रशिक्षण पूर्ण करणे या उपक्रमांमध्ये मध्ये जिल्ह्यामध्ये/ तालुक्यामध्ये/ग्रामपंचायतीमध्ये उद्दिष्ट उपलब्ध नसल्यास इतर उपक्रमांच्या गुणांची सरासरी काढून प्रत्येकी १० च्या प्रमाणात गुण देण्यात यावेत. (उदा. 'अ' जिल्ह्यामध्ये/ तालुक्यामध्ये/ ग्रामपंचायतीमध्ये भूमीहीन लाभार्थी नसेल आणि त्या जिल्ह्याला/तालुक्यामध्ये/ग्रामपंचायतीला इतर ९ उपक्रमांमध्ये ९० गुणांपैकी ५० गुण मिळाले असल्यास उपक्रम क्र.१ साठी ५.५६ गुण देण्यात यावेत.)

**परिशिष्ट ब**

**सर्वोत्कृष्ट घरकुल, सर्वोत्कृष्ट बहुमजली इमारत, सर्वोत्कृष्ट गृहसंकुल व सर्वोत्कृष्ट बहुमजली गृहसंकुल (हाऊसिंग अपार्टमेंट) व निवडीचे निकष**

| अ.क्र. | पारितोषिकासाठी निवडीचे निकष | कमाल गुण | गुणांकन पध्दती |
|---|---|---|---|
| १ | नियोजन आराखडा, प्लास्टर, फरशी/लादी, किचन ओटा व रंगरंगोटी असलेले घरकुल. | २० | नियोजन आराखडा, प्लास्टर, लादी, किचन ओटा, रंगरंगोटी असल्यास प्रत्येकी ४ गुण देण्यात यावेत. |
| २ | किमान कालावधीत पूर्ण केलेले घरकुल. | २० | भौतिकदृष्ट्या व आर्थिकदृष्ट्या किमान कालावधीत म्हणजे ६० दिवसात घरकुल पूर्ण केल्यास २० गुण, ९० दिवसासाठी १८ गुण, १२० दिवसासाठी १६ गुण याप्रमाणे दर वाढीव महिन्याला २ गुण कमी करण्यात यावेत. |
| ३ | शासकीय योजनांशी कृतीसंगम असलेले घरकुल. | २० | शासन निर्णयातील अ.क्र.३ (X) मध्ये शासकीय योजनांशी कृतीसंगम मधील नमूद ५ मुदद्यांच्या आधारे प्रत्येकी ४ याप्रमाणे गुण देण्यात यावेत. |
| ४ | रेन वॉटर हार्वेस्टींग, किचन गार्डन/परसबाग, वृक्ष लागवड, सौरउर्जा साधने व नेट बिलींग, इ. सुविधा असलेले घरकुल. | २० | रेन वॉटर हार्वेस्टींग, किचन गार्डन/परसबाग, वृक्ष लागवड, सौरउर्जा साधने व नेट बिलींग यास प्रत्येकी ४ याप्रमाणे गुण देण्यात यावेत. |
| ५ | मूलभूत सुविधा (अंतर्गत रस्ता, ड्रेनेज व्यवस्था, इ), घरावर योजनेचा लोगो, लाभार्थ्यांचे (पती-पत्नी) नाव, ग्रामपंचायत प्रॉपर्टी रजिस्टरमध्ये नोंद, इ. | २० | मूलभूत सुविधा (अंतर्गत रस्ता, ड्रेनेज व्यवस्था, इ), घरकुलावर योजनेचा लोगो, लाभार्थ्यांचे (पती-पत्नीचे) नाव, ग्रामपंचायत प्रॉपर्टी रजिस्टरमध्ये नोंद, यास प्रत्येकी ५ याप्रमाणे गुण देण्यात यावेत. |
| | एकूण गुण | १०० | |